भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळांच्या कक्षेतील
नामनिर्देशनाच्या कोटयातील गट "क" वर्गीय पदे
भरताना परीक्षा शुल्काबाबत अनुसरावयाची कार्यपद्धती
स्वीय प्रपंजी लेखा खात्यास दिनांक ३० सप्टेंबर, २०११
पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन

शासन निर्णय क्रमांक : प्रानिमं १०११/प्र.क्र.२/११/१३-अ,
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०३.०८.२०११

वाचा : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : प्रानिमं २००७/ प्र.क्र.४६/०७/भाग (२)/१३-अ, दिनांक १० एप्रिल, २००८,
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : प्रानिमं १००९/ प्र.क्र.१७/०९/१३-अ, दिनांक ३० मार्च, २००९,
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : प्रानिमं १००९/ प्र.क्र.१७/०९/१३-अ, दिनांक १ जानेवारी, २०१०,
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : प्रानिमं १०११/ प्र.क्र.२/११/१३-अ, दिनांक २० मे, २०११

**शासन निर्णय :**

संदर्भाधिन क्रमांक १ येथील दिनांक १० एप्रिल, २००८ च्या शासन निर्णयान्वये जिल्हाधिकारी, प्रादेशिक विभाग प्रमुख व विभाग प्रमुखांच्या पदनामाने जिल्हा कोषागार कार्यालय/अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथे स्वीय प्रपंजी लेखा खाते (PLA) उघडण्यास परवानगी देण्यात आली आहे. उक्त संदर्भाधिन क्रमांक २ येथील दिनांक ३० मार्च, २००९ च्या शासन निर्णयानुसार स्वीय प्रपंजी लेखा खात्याची मुदत दिनांक ३१ डिसेंबर, २००९ पर्यंत ठेवण्यात आली होती. पद भरती प्रक्रियेला लागणारा कालावधी विचारात घेऊन ज्यांची पदभरती प्रक्रिया प्रलंबित आहे व दिनांक ३१ डिसेंबर, २००९ पर्यंत पूर्ण होऊ शकणार नाही अशा अधिकाऱ्यांच्या स्वीय प्रपंजी लेखा खात्यास संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये दिनांक ३० जून, २०१० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती व सदर खाते दिनांक ३० जून, २०१० नंतर पुढे चालू राहणार नाही, असे नमूद करण्यात आले होते.

२. सर्व जिल्हाधिकारी कार्यालयांनी उघडलेल्या स्वीय प्रपंजी लेखा खात्यास मुदतवाढ देण्याबाबत महसूल व वन विभागाने केलेल्या विनंतीस अनुसरुन जिल्हाधिका-यांच्या पदनामाने असलेल्या स्वीय प्रपंजी लेखा खात्यास दिनांक ३०.९.२०११ पर्यंत मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव वित्त विभागाच्या सहमतीनंतर महालेखापाल कार्यालयास सादर करण्यात

आला होता. महालेखापाल कार्यालयाने पुढील अटींच्या अधीन राहून सर्व जिल्हाधिकारी कार्यालयांच्या स्वीय प्रपंजी लेखा खात्यांना दिनांक ३०.९.२०११ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता दिली आहे:-

(i) The Departments where recruitment is to be done in the year 2011-12 and onwards should make necessary provisions in the Budget Estimates in the year 2011-12 onwards under the Object Head 50 - Other Charges. As far as possible, the expenditure on conducting exams for recruitment etc. should be done from such Budgetary provision.

(ii) It is necessary that the Revenue Receipt and Revenue Expenditure will be accounted in the same year in which it is received / incurred. For this purpose, the Treasury Officers should send the information to A.G. (A & E)-II, Nagpur office by 30th August 2011 in the prescribed form for necessary adjustment in Accounts.

(iii) As far as possible, the extension for operation of the Personal Ledger Accounts may not be allowed beyond 30.9.2011. The Departments may be requested to complete the entire procedure by this date and it may also be specified that any expenditure on examination for recruitment will be done after obtaining the Budget Grants only.

(iv) Personal Ledger Account is subject to Audit.

३. हा शासन निर्णय महालेखापाल कार्यालयाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक : टीएम/सीएच.२/ युओआर/जीएडी/११-१२/५७५, दिनांक २१.७.२०११ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०८०३१५०५३८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(पां.जो.जाधव)
उप सचिव, सा.प्र.विभाग

प्रति,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
५. सर्व विभागीय आयुक्त,
६. सर्व जिल्हाधिकारी,
७. महसूल व वन विभाग,
८. निवड नस्ती.